# शिवाजी महाराजांचे पहिले नौकावहन - सन 1665



# फ्लॅश बॅक तंत्राने घटनांची मांडणी

# मालंड ते बसरूर नौकारोहण

- शिवाजी महाराजांचे पहिले नौकारोहण. मालंडपासून निघून बसरूरला अंदाजे ३४० किमी वाटेत थांबत जात आठव्या दिवशी पहाटे १४ फेब्रूवारी १६६५ ला पोचले.
- तिथल्या व्यापारी लोकांकडे खंडणीसाठी काहीना ओलीस ठेवले. अचानक घटनेमुळे त्यांच्याकडील होन व इतर चलनाच्या थैल्या, विक्रीचे किमती कापड, दागिने, रत्ने, डच, पोर्तुगीजांच्पा बंदराजवळच्या वखारीतील परदेशातून आलेल्या व पाठवायच्या ठेवलेल्या पेट्या, बोचकी, लवंगा, वेलदोडे, दालचिनी, काळीमिरी वगैरे मसाल्याच्या पदार्थांच्या करंड्या असे हाताला येईल ते सामान आपल्या बरोबर आणलेल्या गलबतांवर चढले .
- तोवर मागून आलेल्या गुराबतील सैनिकांनी पंचगंगावली नदीच्या काठा जवळच्या तुळू, कानडी भाषेतील तांडेलांना पकडून गावकऱ्यांना बोलते करून बेलतूर, बागवडी, हतंगडी, हेमाडी, गुड्डात्ते, कुंदपुर, गांगोळी या आसपाच्या गावतून मिळेत तो माल जमवला.
- जास्त गाजावाजा व्हायच्या आत महाराजांसह डोलकर तांडेल खायचे-प्यायचे सामान गुराब, गलबतांवर भरून पंचगंगावली नदीच्या प्रवाहातून वल्ही मारून निघाले. आणि परतीचा समुद्री प्रवास सुरू झाला.
- महाराजांना सागरी प्रवासातील त्रास व धोके यातून नवे अनुभव मिळाले. सागराच्या डचमळत्या हेलकाव्यामुळे पोटातले बाहेर पडते. दमटपणाने, घामाने हैराण व्हायला होते. लहरी हवामान, वादळी सुसाट वारे अनुभवले.




मालंड ते बसरूर ३४० किमी नौकारोहण ८ दिवसांत पार करून महाराज बसरूरला आले.



बसरूरला पोहोचून लुटले
Trasi Proper
Arate
Belthur
Kattebelthur
Bagvady
गांगोळी
Hemmadi
हेमाडी
Sri Siddhivinayaka Residential School
हतंगडी
Gangolli
Tallur
Hattiangadi Sri Siddhivinayaka Temple
बसरूर
Herikudru
Hattikudru
Balkur
Panchagangavali River
पंचगंगावली
Kodi Delta Point
Basroor
Kundapura
Margoli
Kelakeri
Satvadi
Mudalkatte
Koni
Nerambally
लढाऊ गुराब (ग्रॅब नावाचे मराठ्यांनी केलेले नामकरण) गलबते समुद्रात ठेवून पंचगंगावली नदी पात्रातून वल्हवून जायला सोईचे माचवे बसरूरला पोचले. तोवर आसपासच्या खेड्यात व्यापारी लोकांच्या वस्त्यावर हल्ला करून किमती माल, रोकड, जमिनीत पुरलेले सोने नाणे जमा होऊ लागले.


शिवाजी महाराजांचा परतीचा प्रवास
पहाटे बैंदूर, भटकळ, मुरुडेश्वर आल्याचे महाराजांना वेळोवेळी सांगितले जात होते. होनावरला येई पर्यंत बोटीवर शिजवलेले भात आणि सागूची नवी चव महाराजांच्या आवडीत भर टाकून गेली. सूर्यास्ताकडे नजर लावत महाराजांनी उतरून गोकर्ण बंदरात पाऊल ठेवले.
वादळ, पाऊस, याचा अंदाज करताना डोक्यावरून उडणारे पक्षी, रात्रीच्या निरभ्र आकाशातील तारे चांदण्या पहात जागे राहणारे सराईत सुकाणूधारी, वाऱ्याची दिशा सापडताच डोलकाठीला गुंडाळलेली शिडे पसरताच जहाजांना गती येते. दूरवरून फक्त फडफडणारे झेंडे दिसतात. ते हळूहळू जवळ येतात तेंव्हा येणारी जहाजे कोणाची ते कळून येते. अशी महाराजांच्या माहितीत भर पडत होती.
गोकर्ण
कुमटा
होनावर
मुरुडेश्वर
भटकळ
शिरूर बैंदूर
मरावंते
बसरूर
Ankola
Yana
52
766E
Gokarna
Kumta
Honnavar
Kodani
Nagarbastikeri
Jog Falls
Sagara
Sharavati
Murdeshwar
Bhatkal
66
Shiroor
Khambadakone
Maravanthe
Kundapura



# प्रखर शिवशंभो भक्त शिवाजी महाराजांनी स्थान महात्म्य समजून घेऊन पूजा घातली...

समुद्र किनाऱ्यावर दिसणारे गोकर्ण - महाबळेश्वर मंदिराच्या कळसाचे दर्शन सूर्य मावळताना झाले आणि महाराजांना नुकत्याच झालेल्या सुवर्णतूलेची आठवण झाली.

# जिजामातांची सुवर्णतुला



- ❖शहाजीराजांच्या मृत्यूमुळे महाराजांचे तसेच जिजामातांचे भावजीवन गढूळलेले होते. कोकणपट्टीतील आरमारी मोहीम तहकूब ठेवून महाराज प्रतापगडावर परतले.
- ❖सूर्यग्रहणाच्या पर्वावर यावेळी जिजामातांची तुळा करण्याचे महाराजांनी ठरविले. या तुळाविधीसाठी महाराज आपल्या सर्व कुटुंबियांसमवेत श्रीमहाबळेश्वर क्षेत्री आले.
- ❖सोनोपंत डबीरही यावेळी त्यांच्यासोबत होते. सोनोपंत अतिशय वृद्ध झालेले होते.
- ❖महाबळेश्वराच्या मंदिरासमोर मंडप उभारला गेला. कृष्णा, वेण्णा, कोयना, गायत्री, सावित्री या पंचनद्यांच्या गोमुखातील जलाने तूला विधी अभिषेक झाला.
- ❖ महाराजांच्या भावजीवनातील एक सुखद सोहळा गुरुवार दि. ५ जानेवारी १६६५ रोजी पार पडला. जिजामातांच्या भारंभार तोलले गेलेले सोने, रुपे दान करण्यात आले होते…
- ❖याचवेळी सोनोपंत डबीरांचीही तुला करण्यात आली.
- ❖अवघ्या १९ दिवसांनी दि. २५ जानेवारी १६६५ सोनोजीपंत निवर्तले.
- ❖तुलादान विधी आटपून महाराज मालवणला परतले..

# सिंधुदुर्ग

- ❖ महाराज मालवण बंदरावर उभे होते. समोर सागर खळाळत होता, महाराजांचे लक्ष नैऋत्येकडे सुमारे ३ किमी दूर एका बेटाकडे गेले.
- ❖ हे बेट जाऊन पाहण्याची इच्छा राजांनी प्रदर्शित केली. महाराज होडीत बसून बेटाबर आले.
- ❖ विस्तृत जमीन, गोडेपाणी, दंतुर तटबंदी उभारायची शक्यता, पाण्यातील बुडलेल्या खडकांमुळे मोठ्या बोटी आपटून फुटण्याची शक्यता ओळखून,
- ❖ महाराज म्हणाले, 'या कुरटे बेटाचे नाव आज पासून 'सिंधुदुर्ग' असेल.



# शिवाजी महाराज आधी घडलेल्या घटनांचा सूत्रबद्ध आढावा घेऊ लागले...

- शाईस्ताखानाने ३ वर्षे आपल्या सुभ्यातील शेतसारा, पिके व्यापार उदीम आपल्या हजारो सैनिकांसाठी वापरल्यामुळे नकद पैसा, धान्य टंचाई, वाहतूकी वरील जकात सर्व संघटन मोडतोड होऊन बरबाद झाले होते. ६ जाने १६६४ला सुरतेला जाऊन लुटले.
- औरंगजेबाचा खिसा साफ करायचा तो एकच जालिम उपाय होता. आयते नगद चलन मिळवायचे. शेतकऱ्यांना पिकांना बियाणी घ्यायला पैसे द्यायचे.
- समुद्रतटावर जकातनाकी बसवून वाहतूक सुरळीत करायची.
- विदेशी लोकांच्याकडून त्यांची समुद्री जहाजबांधणी करायची आधुनिक पद्धत समजून घेऊन आपल्या स्थानिक कारागिरांना कामाला लावायचे.
- समुद्रतटावरील खडकबेटे शोधून तिथे जलदुर्ग बांधायला आखणी करायसाठी सागर सफर करत तटांची पहाणी करायची मोहीम काढणे.









# सैन्य शक्तीची पुनरर्चना यावरील महाराजांचे चिंतन

- चिंचोळा कोकण सागर किनारा, प्रचंड पडणारा पाऊस, भरती ओहोटीमुळे समुद्राचा बदलता किनारा, दूर समुद्रात मासेमारी करणारे, मिठागरे चालवणारे, दमट वातावरण,
- अत्यंत हालाखीची कष्टमय जीवन पद्धती, किरकोळ शरीर यष्टी, चिवटपणे निसर्गाशी झुंजत राहिल्याने खमकेपण, पुरुषांच्या बरोबरीने शेतात काम करणाऱ्या, मासळी बाजारात विक्रीतंत्र सांभाळणाऱ्या, हिशोब करण्यात पटाईत बायका,
- * तांदूळ, वरी, नाचणी मोजकी धान्य संपदा, माड, सुपारी सारखी उंच झाडे, त्याला लागलेली लहान आकाराची फळे त्यातून मिळणारे पदार्थ,
- मधे सह्य पर्वताची डोंगररांगेतील निबिड जंगले, बिकट शिखरे, सुळके, हे पार करण्यासाठी वळणदार धोकादायक वाटा, पटापट चढू शकणाऱ्या काटक शरीरयष्टीच्या सैन्याची लढाईची मानसिकता कोकणातील मोहिमातून शिकता आले, ओळखता आले.

## कोकणपट्टीतील जीवन पद्धती









# घाटावरील जीवन पद्धती, सैन्यशक्ती


















TORNA FORT
CHAKAN FORT
KONDAN FORTS

- ❖ कोकणाच्या विपरीत गरमी व थंडीची विषमता सहन करणारे कोरडे हवामान,लहरी पाऊस.
- ❖ घाटमाथ्यावरील सुपीक काळ्या मातीत शेती करणारे हात.
- ❖ आधीच्या राजसत्तांनी बांधलेले गड-किल्लेदार, जमीनदारी वसूली पद्धत, मुगली, बहामनी सैन्याचे युद्धतंत्र,
- ❖ उत्तर भारतात पसरलेले,तुरकी, पठाणी सैन्य,अवजड तोफा,घोडेस्वारी करत करत अचुक तिरंदाजी करणारी कसबी फौज बाळगणारे सत्ताधीश.
- ❖ त्यांच्या युद्धतंत्राशी टक्कर देताना सेनाभरतीची पुनरर्चना  शिवाजी महाराज दूरदृष्टीने विचारपूर्वक  करत असत.



# शिवाजी महाराजांच्या नौदलाच्या संकल्पना



- ❖गोकर्ण बंदरातील शांत सागर आणि महाबळेश्वर मंदिरातील पवित्र वातावरणात आपल्या नौदलाच्या संकल्पना आकारू लागल्या.
- ❖पोर्तुगीज, डच, इंग्रज, अरब, सिद्दी, विजापुरकर यांच्या, वाहतूक बोटी,चाच्यापासून चोरट्यांचा सुळसुळाट, मासेमारी, मीठ बनवायचे व्यवसाय विना व्यत्यय चालू राहायला तटांची सुरक्षा वगैरे गरजा समजून आल्या.
- ❖जमिनीवरील राजकारणातून उसंत मिळाल्याने उत्तरेला भिवंडी-कल्याण, ते दक्षिणेत बसरूर, कारवार, गोमांतक किनारा हे आपल्या राज्याचे, सर्वात महत्वाचे क्षेत्र, म्हणून कोकणपट्टीच असू शकते. हे मनात ठसले.
- ❖भावी काळात घाटावरील किल्ले,जमिनीचा महसूल गमावला गेला तर सह्यपर्वताचे कडेकपारी, दाट जंगल आणि कोकण किनाऱ्यावरील मालवाहतूक, व्यापार आपल्याला वाचवू शकतात.
- ❖तटसुरक्षित करायला जलदुर्ग, सुसज्ज नाविक दल याशिवाय पर्याय नाही. भावी काळात याच भागात राजधानी बनली पाहिजे. असे मत प्रकर्षाने दृढ व्हायला लागले.



# आपले नौदल कसे असावे याबद्दल शिवाजी महाराजांचे विचार पक्के होत गेले...



- ❖राज्याचा भूमीवरील विस्तार जसा त्याच्या घोडदलाच्या ताकदीवर अवलंबून असतो, तसेच समुद्रावरील वर्चस्व त्याच्या नौदलाने निश्चित केले जाते. म्हणून राज्याचे आपले स्वतःचे नौसैनिकदल असावे लागते.
- ❖नौदलात मध्यम आकाराचे गुरब आणि गल्बत प्रामुख्याने असावेत. मोठ्या जहाजांसह संपूर्ण नौदल निडर नाविकांनी आणि तोफखाना, हलक्या तोफा, हात गोळे, तोफगोळे, बारांच्या बंदुकांनी सुसज्ज असावेत.
- ❖सामान्यतःबोट पुढे ढकलण्यासाठी वारा आवश्यक असलेली मोठी जहाजे बांधली जाऊ नयेत.
- ❖तथापि, राज्याचा प्रतिष्ठा राखण्यासाठी अशी एक किंवा दोन जहाजे बांधली जावीत,
- ❖नौदलात योग्य सुभे असावेत, प्रत्येक सुभा पाच गुरब आणि पंधरा गल्बतांचा असावा. सर्व सुभे एकत्रितपणे एक सरसुभा बनले पाहिजे. त्याचे नेतृत्व करणारा सदैव राजाच्या थेट संपर्कात असावा.
- ❖नौदलाच्या देखभालीसाठी जमीन वाटप करावी. सामान्यतः बोटींच्या देखभालीचा खर्च उत्पन्नाच्या इतर स्त्रोतांमधून भरला जाऊ नये. महाराजांच्या पश्चात रामचंद्र पंत अमात्यांनी आज्ञापत्रात शब्दांकित कलमातून  झालेल्या महाराजांच्या द्रष्टेपणाची महानता कळते.

# अंकोल्याला महाराज बोटीतून उतरुन खुष्कीच्या मार्गाने कारवारकडे रवाना

तीर्थयात्राकरून ४००० पायदळासह महाराज अंकोल्यास गेले. तेथून त्यांनी लुटीची जहाजे पुढे पाठवून दिली व स्वतः सैन्यासह खुश्कीच्या मार्गाने ते कारवारकडे निघाले.



# बंकापुराहून बहलोलखानाचा दुय्यम अधिकारी शेरखान हाही अचानक एका खाजगी कामासाठी कारवारला आलेला होता. त्याला महाराजांच्या आगमनाची गंधवार्ताही नव्हती.



# कारवारमधील कारवाई - शेरखानाशी सलोखा

- कारवारचा सुभा बहलोलखानाकडे होता. बहलोलखानाच्या आईला मक्केच्या यात्रेसाठी जायचे होते. त्यासाठीच रणदुल्लाखानाचे एखादे गलबत भाड्याने ठरविण्यासाठी शेरखान कारवारला आला होता. (दि. २१ फेब्रुवारीच्या१६६५ रात्री)
- शेरखानाजवळ जेमतेम २०० घोडेस्वार व ३०० पायदळ सैन्य होते. महाराज कारवारवर अकस्मात चालून येत असल्याची बातमी त्याच्या कानावर पडली. त्यामुळे आधी कारवारच्या रक्षणाची व्यवस्था करणे त्याला भाग पडले.
- शेरखानाने ताबडतोब इंग्रजांना निरोप पाठवून खाडीचे रक्षण करण्यास सांगितले, शक्य तेवढा बंदोबस्त करून त्याने महाराजांकडे आपण कारवारला आलो असल्याचा निरोप पाठविला, कारवार शहरातून महाराजांनी जाऊ नये अशीही विनंती केली.
- शेरखान हा सेनापती खान मुहम्मदाचा पुत्र होता. खान मुहम्मदाला बड्या बेगमेने अफझलखानाच्या तक्रारीवरून पूर्वी ठार केले होते. शेरखानाचा धनी बहलोलखान हाही शहाजीराजांच्या पक्षाचा होता. त्यामुळे महाराजांनी शेरखानास न दुखविण्याचे ठरविले.
- शेरखानाच्या निरोपानुसार ते कारवारवर चालून न येता काळी नदीच्या मुखाशी उतरले.

# शेरखानाला पडला पेच




- ❖ काळीनदीच्या मुखाशी तळ ठोकून महाराजांनी आपला दूत शेरखानाकडे पाठविला व आपल्या आगमनाची वार्ता त्याला कळविली.
- ❖ खाडीत 'लढाईच्या पवित्र्यात' उभे असलेले इंग्रजांचे व काँगोचे गलबत एकतर शेरखानाने आपल्या ताब्यात द्यावे
- ❖ अथवा त्यांचेवर सूड उगविण्यासाठी परवानगी द्यावी अशीही मागणी महाराजांनी शेरखानाकडे केली.



❖ शिवाजी जसा सुरतेवर चालून गेला तिथल्या व्यापारीपेठेची धूळधाण झाली अशी आपली होऊ नये म्हणून कारवारच्या सर्व व्यापाऱ्यांनी महाराजांना सन्मानपूर्वक सामुदायिकरीत्या नजराणा अर्पण करण्याचे ठरविले. त्यानुसार इंग्रजांच्या वाट्यावर १२३ पौंडांचा खर्च बसविला गेला,
❖ शेरखानाने ही सामुदायिक खंडणी महाराजांना पेश केली व कारवारवरील संकट टाळले. महाराजांचा मुक्काम कारवारला दोन दिवस होता.
❖ दि. २३ फेब्रुवारी रोजी ते कारवारवरून २५ मैलावरील भीमगडास जाण्यास निघाले.
लोंढा
भीमगड मत्सेंद्रनाथ मठ स्थान
साखळी
फोंडा
दूधसागर
मडगाव
कंकोळी
काणकोण
बसरूरपर्यंत नौकानयन करून महाराज परतले
कारवारी व्यापाऱ्यांकडून खंडणी वसूली मोहीम
Chandgad
चंदगड
Bhimgad Wildlife Sanctuary
Londa
Ganeshgudi
Mollem National Park & Bhagwan Mahavir...
Sanquelim
Dicholi
Colem
Old Goa
Ponda
Vodlemol Cacora
Netra
Panaji
Verna
Madgaon
Nuvem
Vasco Da Gama
Colva
Varca
Cuncolim
Halga
Canacona
Majali
Todur
Karwar

❖ अंकोल्याहून बोटींचा तांडा बसरूरला मिळवलेल्या सामानाला लादून चौल बंदराला नेला गेला. कारवारला अचानक शेरखानाकडून उपहार मिळाला. नंतर बरोबर आलेल्या ४ हजाराच्या पायदळाला फोंडा जाई पर्यंत बरोबर नेले होते.

❖ त्यांना मालवण, वेंगुर्ला, राजापूर, अशा भागात आपापल्या परतण्याच्या आज्ञा देऊन मोजके सैन्य नोकर घेऊन भीमगडाच्या जंगलात पोचले. बोटीवरच्या पहिला प्रवासातील पोटातील डचमळ, जमिनीवर उतरले तरी पाण्यातील हेलकाव्यांचा आभास, झोपायची चिंचोळी जागा, कानात सागराची गाज असे अनुभव घेताना जलप्रवासातील गैरसोई, दगदग यातून उसंत मिळावा म्हणून कोकणातील दमट हवे पासून दूर कोरड्या थंड हवेच्या भीमगडावर राहायचे ठरले.

❖ एका मठात भोजनाचा शिधा,घोड्यांच्या वैरणीची सोय लावून नोकरांनी महाराजांचे दाढी, केसरचना, घामाचे कपडे धुवायला घेतले. माशांचे कालवण-जाडभाताचेजेवण खाऊन कंटाळलेले महाराज विश्रांती घेत सरदारांशी खेळीमेळीने बोलते करत प्रवासातील किस्से ऐकायला सहभागी होत होते. वामकुक्षी घेऊन सायंकाळी दिवे लागायच्या आधी भोजन करून मठाच्या अंगणात पांघरूणात पडल्या पडल्या आधीच्या घटनांची उजळणी करू लागले.

❖ शायिस्ताखानाला मारायला केलेला वार चुकवून तो पळून गेला, जोधपुरचा जसवंतसिह सिंहगडाचा वेढा सोडून रागावून परत गेला. सिंहगड परत मिळाला...औरंगजैबाने अदिलशहावर दडपण आणून सेनापती आझीजखानाला कोकणपट्टीत चौलबंदर काबीज करून जकातीचे बुडणारे उत्पन्न मिळवायला पाठवले गेले.

❖ सावंत सरदार मधे पडून विजापुरकरांना मिळाला. जावळीचे मोरे, लखम सावंत देसाई या सारख्या संस्थानिकांना आपली जहागिरी वाचवायची असल्याने ते बदलत्या राजकारणात दल बदलायची खेळी करतात. त्याना सलोख्याने हाताळण्याने आपले कायमचे शत्रू न बनवता मोठी कामगिरी व धन संपत्तीचा लोभ दाखवणे मोठ्या राजकारणातील खेळी परवडेल. असे ठरवत महाराजांना झोप लागली.

# भीमगडावर विश्रातीचे काही दिवस





मत्सेंद्रनाथ मठाचे आजचे रूप व दूरवरचा प्रदेश

# महाराजांच्या नजरेसमोरून वेगवेगळ्या घटना तरळल्या...

- १६६४ सालातील घाटावरील मोहिमा, खाजगी घटनांचा पट महाराजांच्या डोळ्यासमोर स्वप्नवत सरकत गेला.
- जानेवारीत सुरतेत सुऱ्याच्या प्राणघातक हल्ल्यातून बचावलो.
- राजगडावर दि. ५ फेब्रु.१६६४ ला, परतलो त्यावेळी दि. २३ जाने. १६६४ची शहाजी राजे यांच्या अपघाती निधनाचीकटू वार्ता समजली.
- आईसाहेबाना सती न जाण्यासाठी मनधरणी करून सावरावे लागले.
- मे च्या पहिल्या आठवड्यात जसवंत सिंह वेढा सोडून गेल्याने सिंहगड परत मिळाला.
- वडील गेल्यानंतर औरंगजेबाला विजापूरकरांची मदत होऊ नये यासाठी आदिलशाही दरबारात ३० हजार होन, २ हत्ती व ८० सुंदर घोड्यांचा घसघशीतएक नजराणा पाठवला.
- मोबदल्यात आदिलशाहाने मोगलांशी असलेला स्नेह तोडावा असे बोलणे लावले.
- आपल्याकडील किल्ले, तटबंदी, चोरवाटा, राजमार्ग दुरुस्ती साठी तरतूद सुरू केली.

- कोकणात १६६४सालापासून आपली व्यापारी गलबते मस्कत, इराण, मक्केपर्यंत जाऊन आली.
- आपल्या बोटीना संरक्षण हवे म्हणून कल्याण, खारेपाटण, अशा नजरेपासून दूर ठिकाणी ६० लढाऊ गलबतांची बांधणी लहान गोद्यात सुरू झाल्या.
- पेण जवळ करतलब खानाने शरणागत होऊन टाकलेली शस्त्रे, उमदे घोडे, याचा वापर करून हजारो कोकणी तरुणांचे दल उभारले.
- ते दल बसरूर, कारवार पर्यंत आसपासच्या किल्ल्यातून, किल्ल्या बाहेरच्या खेड्यात विखरून तयार ठेवले .
- तरांडी, वल्ही, वाखाचे बळकट दोर, शिडांसाठीचे भरडे कापड शिवणासाठी लांब दाभणे, जाळ्या याची निर्मिती पोर्तुगीजांच्या अपरोक्ष चालू केली.
- सुतार, गवंडी, पाथरवट, इतर दुरुस्ती कामगार मुरुड जंजिऱ्यापासून लांब वसवले. त्यांचा डच, पोर्तुगीज, इंग्रज, सिद्दीशी संपर्क तोडला.
- संदेश पाठवायला गावागावात लिहिणारे वाचणारे भरती केले.
- तुरकी, अरबी, पोर्तूगाली, फ्रेंच. डच, कानडी, तेलुगू, तमिळ विदेशी भाषेचे जाणकार शोधून  पदरी ठेवले.

# मुगल सैन्यातील तैनात कशी असे ? मिलिटरी कमांडर सांगतात

**१. मुख्यालय छावणी** - अनेकदा "बुलंद छावनी " किंवा "फतह छावनी " अशी गौरवाची नावे दिली जात. दलाचा त्या मोहिमेचा सरसेनापती शक्य असेल तर जवळच्या किल्ल्यात तळ ठोकून असत. किल्ल्याच्या पायथ्याशी सभोवताली इतर वरिष्ठ सरदारांना मानानुरूप तंबू, कनातीचा आडोसा करून राहायची सोय केली जात असे.

२. पश्तून किंवा पठाण, बलोची, उझबेकी, काझिकिस्तानी, तुरकमेनी, मंगोली सरदार आपापल्या सेनेच्या खानावळी, बोलीच्या गटागटाने डेरा करून असत. राजपूत, मराठे सरदारांच्या सेना मानाप्रमाणे जवळ - दूर असत. सेनापतींना मोहिमेची आखणी करून कोणी कुठे असायचे, किती सैनिक, तोफखाना, दारूगोळा हवा. घोडदळाने मागे राहून पायदळाच्या पुढे गेलेल्या चकमकीच्या तुकड्यांना दूरवरून भाले, तीर मारून कवच रक्षण करायचे. वगैरे नियोजन केले जात असे.

३. त्या भागातील स्थानिक सरदार, त्यांचे हेर उपयोगी असत. त्यांना धनलाभ, पदाच्या मिषाने आपल्या निष्ठा बदलत्या ठेवाव्या लागत. सैनिक विश्रांती, नमाज़, चमचमीत खाना, शस्त्रे, जपणूक करत. सकाळी प्रातर्विधीसाठी लांब कुठेतरी जावे लागे.

४. घोडे, बैल, गाढवे वगैरे चरायला गवत देऊन, पाणथळ जागी नेत कोणासमोर लढावे लागेल ते समजणे कठीण असे. ‘सिवा और उसके चूहे’ असे निंदा दर्शक बोल वापरून आपल्या मोठेपणाचा बोलबाला इन्शा अल्लाह, माशाल्लाह करत होत असे. ललकारी देणारे ओरडून सरदारांच्या मानाच्या पदव्या, नावे देत आपापल्या दलाचे मनोधैर्य वाढवत असत.

५. स्थानिक होतकरू तरुण (वसाडे - आजकाल स्वैर अर्थाने प्रचलित शब्द) कामाच्या आशेने अगोचरपणे सैनिकांचे पाय चेपणे, त्यांचे कपडे धुणे, प्यायला पाणी आणणे, जेवण बनवायला, वगैरे अंग मेहनतीची कामे करत. काही जनावरांना चारा देणे, खरारा, तोबरा भरणे, पाणी पाजायला जवळच्या पाणथळाला नेणे, रोट, गवताचे भारे ने-आण करायला मदत करत. कानावर पडेल त्यातून काय ठरते आहे, किती सैनिक असावेत, यावर लक्ष ठेवून ती माहिती ज्यांना गरजेची असेल त्यांना वेळेवेळी देऊन कमाई करत.

६. मुगलांच्या सैन्याचे कबीले काही किलोमीटर दूर ठेवले जात. मुख्य शिबिराच्या आज्ञा, पुढील नियोजन, शत्रूच्या धमक्या किंवा हालचालींना प्रतिसाद देण्याची मुभा असे.

# पेट्रोलिंग प्लाटून गस्ती टोळ्यांची भूमिका: स्कर्मिशर्सची भूमिका:

पेट्रोलिंग प्लाटून - गस्ती टोळ्या :

- ❖ रसद, खानपान सेवा, गवत, पाणी पुरवठा पुरवठा करायचा जबाबदार विशेष गट असे.
- ❖ ते सैन्याला गरजेनुसार विविध आकार, लांबीचे भाले, बाण, तेलाचे बोळे, आदीचा पुरेसा पुरवठा, करायला हजर असत.
- ❖ गस्ती तुकड्या ऐन धुमश्चक्रीत निरोप घेण्या - देण्याची कामे करत.
- ❖ हल्ल्याचा जोर, जोश टिकवण्यासाठी वारंवार आपापल्या  गर्जना देत राहणे, मराठे सैनिक एकमेकांना हर हर महादेव, जय एकलिंगजी, वगैरे घोषणा देत.
- ❖ दोन विरुद्ध बाजूने लढणाऱ्या मराठा सैनिकांना आपल्या सरदारांच्या नावाने पुकारा करून शत्रु की मित्र ठरवून लढावे लागे.

## स्कर्मिशर्सची भूमिका:

- ❖ स्कर्मिशर्स : छापेमार मुगल सैन्याच्या विशेष ऑपरेशन्ससारखे होते. ते सशस्त्र आणि मुख्य दलाच्या पुढे तैनात सैन्य होते. त्यांचे काम युद्ध सुरू व्हायच्या आधी शत्रूची चाचपणी करायला पाठवलेल्या प्लाटून्स असत.
- ❖ समोरासमोर दिसत असताना ते मुख्य युद्धापूर्वी गोंधळ निर्माण करत आणि शत्रूची कमजोर फळी, तोफखाना हेरून तापलेल्या तोफाना थंड व्हायला लागणाऱ्या अवधीत त्या कमजोर करत .
- ❖ शिवाजी महाराज तोफांचा वापर रणांगणात करत नसत. किल्यावरील तटांवर, जहाजांवर दुरून भेडसावायला करत.

# मराठा सैन्याची तैनाती

१. मुगल सैन्य कधी कुठे जायला निघाले आहे यावरून मोहिमेत चर्चा विचार केला जाई. नेताजी पालकर, मोरोपंत पिंगळे, येसाजी कंक, तानाजी मालुसरे असे सरदार महाराजांचे बारगीर पद्धतीने पगारदार होते. याशिवाय शिलेदार पद्धतीने अनेक जण आपापले सैनिक, शस्त्रे, जनावरे घेऊन मोहिमेत सामील होत.

कुडाळ ते झाराप वाटेवर झाडीत लपलेला साळगाव - भाग आहे.
खवासखानावर वारंवार झडपा घालून हुसकावून लावायला सोईचा असावा.

२. घक्का तंत्राने अपरात्री, पहाटे, वाटेत जात असताना चिंचोळ्या जागेत, खिंडीत गाठून, हल्ला करून मुगलांना सैरभैर करून, मनाने जिंकायची जिद्द संपवणे वगैरे युक्त्या वापरल्या जात. अचानक आल्या प्रमाणे आसपासच्या डोंगराळभागात पसार होणे हे तंत्रही प्रभावी होते. म्हणून निंदा दर्शक चूहा म्हणत.




३. अवेळी छापा घालायला सोईचे म्हणून आधीच्या रात्री जेवण कमी वा न करून, प्रातर्विधीची समस्या, सोडवली जात असावी. एकदम सगळे सैन्य न वापरता, आळीपाळीने दगड पिशव्यात, बाण, भाले बिंडे बांधून तयार ठेवून पायदळाला पोहोचवाये, जो जखमी होईल त्याला उचलून, परत आणायला काम नव्याने भरती झालेल्यांना करावे लागे.

- रांगणा किल्ला आदिलशाही सरदार सावंत यांच्याकडे होता, नंतर हा किल्ला छत्रपती शिवाजी महाराजांच्या ताब्यात आला.
- कुडाळच्या लढाईत ३ ठिकाणांच्या हल्ले करायला जमवलेल्या सैन्याला घोडे, वाहतूक जनावरे, शस्त्रे भोजनालय यासाठी वापरला असावा.

# विजापुरचा अजीजखान वेंगुर्त्यास असताना वारला...

❖ सावंताच्या ताब्यात कुडाळ देऊन विजापूरहून आलेला अजीजखान वेंगुर्त्यास बंदरावरील जकातीचा बंदोबस्त करायला गेला होता. त्या मुक्कामातच दि. १० जून १६६४रोजी तो मृत्यू पावला.
❖ अजीजखानाच्या मृत्यूला शिवाजी जबाबदार असल्याच्या अफवा होत्या.
❖ कुठल्याही घटनेच्या मुळाशी 'शिवाजीचे अस्तित्व शोधण्याची' इंग्रजांची वृत्ती त्यांच्या राजकारचा भाग असावी !









# मुधोळहून बाजी घोरपड्यांना कुडाळ मोहिमेत पाठवले होते...

- अजीजखानाच्या जागी आदिलशाहाने ऐदी रुस्तमेजमानची नेमणूक केली.
- शाही आदेश मागविण्यासाठी तो पावसाळ्याचा बहाणा करून हुक्केरीस येऊन विश्रांती घेत बसला.
- शेवटी हबशी खवासखानला विजापूरहून पाठवले गेले.
- मुधोळहून बाजी घोरपड्यांना मराठा सेनेतील वरिष्ठ सरदार, भाषा व कोकणचा परिचित परिसरात वावरायचा अनुभव, भोसले घराण्याचा पारंपारिक द्वेषभाव असे ओळखून सैन्याचे खजिनदार अशी जबाबदारी दिली गेली.



# मुगल सैन्याची तैनात कशी असे? कथनाचा आधार घेऊन खवासखानाने मोहीम कशी चालवली...

- कुडाळच्या किल्ल्यातील बालेकिल्ला हे खवासखानाचे मुख्य झाले. या तटबंदीच्या बाहेर आपल्या जवळच्या हबशी सैनिकांचा पहारा बसवला.
- तिथेच बाजी घोरपड्यांना आपल्या बरोबर आणलेल्या पैसे, अडकेल, महत्वाचे दस्तऐवज, वगैरे जोखमीचे काम देवून वसवले.
- कुडाळ ते वेंगुर्ला रस्ता आपल्या ताब्यात घेतला. शिवा आपल्या सेना घेऊन कुठून हल्ला करायची शक्यता आहे ते शोधायला सध्या कुठे आहे शोधायला गस्ती टोळ्या पाठवल्या.



# कुडाळ रणभूमीची रचना




- ❖ कोकणातील डोंगराळ भागात कुडाळ गावाची रचना सपाट जमिनीची असल्याने मुगली सेनेला आपल्या युद्धसामुग्रीचा वापर करून शत्रूला हरवायला सोईचे होते.
- ❖ या उलट टेकाडे, झाडीचे अडोसे यामधून अचानक हल्ले करून सैन्य विस्कळीत करून नक्की काय करायचे याच्या आज्ञा न मिळेनाशा झाल्याने लढाई न करता पळून जाऊन जीव वाचवणे,
- ❖ हा पर्याय म्हणून ते पळून जात. ऐनवेळी पळून गेलेल्याना एकत्र जमवून परत लढायला नेणे शक्य झाले नाही तर शस्त्रे, रसद, दारूगोळा, नगद पैसा अडका टाकून मोठे नुकसान होत असे.

❖ खवासखान १० हजार स्वारांसह कोकणात शिरला.

## लखम सावंताचा सैन्य तळ

❖ महाराजांसोबत ८००० घोडदळ व १०,००० पायदळ, ९० लढाऊ गलबते बंदरात होती.

❖ मालवणला व खाली कोकणात सिवाच्या मोहिमा चालू होत्या. हे लक्षात घेऊन खवास खानाने लखम सावंताला कुडाळच्या रस्त्यावर उतरून त्याच्या सैन्याला तळ करायला लावून आपल्या सैन्याला शक्यतो लढायला लागू नये असा बंदोबस्त केला.



# खवासखानाची पळापळ

- ३१ ऑक्टोबर १६६४ ला हबशी खवासखान बांदा-चंदगड करत विजापूरकडे पळाला.
- पराभवामुळे त्याला तोंड दाखवायला जागा नव्हती.
- तशात बाजी घोरपडेला सिवाने मारला.
- त्याच्याकडील धन मिळवले कुडाळ किल्ला तट मोडून टाकला.



## महाराजांच्या आज्ञेने नेताजी पालकरांच्या सैन्यातील एका सरदाराने फोंडा घेतले

## ❖ दुसऱ्या सरदाराने खानापूर, हुबळी धारवाड परिसरात धुमाकूळ घालून दहशत पसरवली



- ❖ कोकण किनाऱ्यावर दर्यासारंगच्या नेतृत्वाने वेंगुर्ल्याच्या बंदरात आलेल्या विदेशी बोटींचा ताबा घेतला.
- ❖ हस्तीदंत व अन्य माल ताब्यात घेतला.
- ❖ डच, पोर्तुगीजांच्या बोटीना मराठा नाविक 90 लहान मोठ्या बोटींनी घेरुन हुसकून लावले.



# बसरूर नौकानयनातील अनुभवाची सांगता...

- मिलिटरी कमांडर प्रत्येक मोहिमेतून शिकत असतो. पाण्यात उतरले की जग नव्याने समजून येते.
- बोटीवरील खडतर दिनचर्या, एकटेपण यातून निसर्गासमोर आपले गौणत्व विशेष जाणवते. जमिनीवरील संघर्ष  करताना बऱ्याच गोष्टी आधी ठरवता येतात.
- नौका लढ्यात लहरी हवामान, भरती-ओहोटीचे तंत्र, संथ चाल, दिशा दर्शन समजणारे तांडेल, चपळ, पट्टीचे पोहणारे वल्हेकरी, भोजन पद्धतीत बदल, बोटीवरील कामकऱ्यांचे अडेल वर्तन, चाचेमारी, बोटीवरील शस्त्र संभार, अशा कित्येक गोष्टींचे भान राखावे लागते.
- शिवाजी महाराजांच्या बाबतीत असेच घडले असे मिलिटरी कमांडर मानतात. कमोडर  म्हणतील, कोकणपट्टी मराठा राज्याची हार्ट लँड आहे. कारण भविष्यकाळात  सह्याद्रीतील जंगल, डोंगरी दऱ्या खोऱ्यात शत्रूला चकवून कोकणात उतरायला, वेळ-प्रसंगात बोटीने कुठेतरी जलदुर्गात लपायला शक्य असावे. व्यापारी जहाजांवरील जकात वसूली ही अनंतकाल पर्यंत न संपणारा अर्थिक झरा आहे.
- हे सर्व साध्य करायला सागरी सत्ता आपल्या नियंत्रणाची हवी. बोटीचे आकार, वजन, लाकूड, शिडाचे भरडे कापड, कारागीर आणि व्यापारी आपले हवेत. किनारे , मालधक्के, गोदी निर्मिती, जाड दोरखंड, तोफगोळे इतर नाविक शस्त्र संभार तयार करणारे हात आपल्याकडील असले पाहिजेत. खर्चिक असले तरी याला प्राधान्य हवे.
- विदेशी लोकांना जमिनीची मालकी देणे आत्मघात आहे. भाडेपट्टा देऊन दरवर्षी भाडे  वसूली करत आर्थिक वाटा तयार करणे वगैरे आगामी आखवणीत लक्षात आले.
- म्हणतात,  मिलिटरी कमांडर प्रत्यक्ष अनुभवाने चतुर बनतो.





# या शोधकार्याच्या मर्यादा

- ❖ युद्धशास्त्रीय दृष्टीकोनातून आजकालच्या लष्करी आधिकाऱ्यांना आज्ञा मिळाली तर ते संशोधनात्मक स्वातंत्र्य घेऊन, ह्या सारख्या मोहिमा त्या काळातील मर्यादा लक्षात ठेऊन कशा नियोजित करून पार पाडतील या प्रमेयावर हे शोधकार्य आधारित आहे.
- ❖ भारतीय इतिहासात अनेक ठिकाणी ऐतिहासिक लढायांचा तपशील विश्वसनीय पुराव्यांच्या अभावी उपलब्ध नाही.अशा वेळी त्या लढायात सहभागी व्यक्तींच्या जीवनातील वर्तणून, शौर्य, धैर्य, शस्त्रसंभार यांची जाणीव ठेवून या मोहिमा सादर केलेल्या आहेत.
- ❖ प्रत्यक्ष घटना अशाच घडल्या होत्या असा दावा नाही. समरांगण कसे काय घडले असावे अशी शक्यता दाखवण्याचा प्रयत्न आहे.

